सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाचा प्रधानमंत्री मातृ वंदना या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या आवर्ती निधीच्या अनुरुप सर्व साधारण घटकाचा (General) राज्य हिश्याचा ४०% निधी वितरित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रमाव-२०२१/११००/प्र.क्र.४५६/कु.क.
गो. ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला, ए विंग,
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई -४०० ००१.
तारीख: ३१ मार्च, २०२२

वाचा -

१)सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.प्रमावं-२०२१/११००/प्र.क्र.४५६/कु.क., दि.१७.०९.२०२१

२) केंद्र शासनाचे पत्र क्र.No.१५/२/२०२१-PMMVY-Part (३), दि.२८.३.२०२२

३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा.क्र.राकुकका/PMMVY/शासन निर्णय निर्गमित करणेबाबत/२३६३८-४०/२०२२, दि.३०.३.२०२२

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री मातृ वंदना ही केंद्र पुरस्कृत योजना आहे.सदर योजना सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षापासून केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून (६०: ४० यानुसार) राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र शासनाचा ६० % व राज्य शासनाचा ४० % आर्थिक सहभाग आहे. सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाचा केंद्र हिश्याचा (आवर्ती) म्हणून सर्वसाधारण घटकासाठी संदर्भ क्र.२ च्या आदेशान्वये रु.२५,५९,१२,५८८/- (रुपये पंचवीस कोटी एकोणसाठ लाख बारा हजार पाचशे अठ्ठयाऐंशी फक्त) एवढा निधी केंद्र शासनाने राज्यास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये थेट जमा झाला आहे. सदर निधीच्या अनुरुप ४०% प्रमाणे राज्य हिश्याचा रु.१७,०६,०८,३९२/- एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रधानमंत्री मातृवंदना योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण घटकासाठी केंद्र हिश्याचा (आवर्ती) रु.२५,५९,१२,५८८/- (रुपये पंचवीस कोटी एकोणसाठ लाख बारा हजार पाचशे अठ्ठयाऐंशी फक्त) एवढा निधी राज्यास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीच्या अनुरुप ४०% प्रमाणे राज्य हिश्याचा रु. १७,०६,०८,३९२/- (रुपये सतरा कोटी सहा लाख आठ हजार तीनशे ब्याण्णव फक्त) एवढा निधी वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे देयक कोषागारात सादर करुन राज्य हिश्श्यापोटी आवश्यक असलेला ४० % एवढा निधी प्राप्त करुन घेऊन आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा करण्याची कार्यवाही करावी. यासाठी सहसंचालक (अर्थ व प्रशासन ) आरोग्य सेवा, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा झाल्यानंतर लाभपात्र लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात यावे.

४. सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, (००) १०३ माता व बाल आरोग्य, (०२) प्रधानमंत्री सुरक्षित मातृत्व सहयोग कार्यक्रम, (०२) (०१) प्रधानमंत्री मातृ वंदना योजना, (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम) (२२११ १३८८), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

५. सदर खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदर निधी हा सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १००/१४७२, दि.३१.०३.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२४/२०२२/व्यय-१३, दि.३१.०३.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११७५२२७९८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.31 20:10:08 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा १/२ मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
७. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
९. वित्त विभाग, व्यय -१३ / अर्थसंकल्प -९, मंत्रालय, मुंबई.
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प / लेखा), मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती (कु.क.)